**कोव्हिड-१९ संबंधित कर्तव्य बजावत असताना कोरोना विषाणूचा संसर्ग होऊन मृत्यू पावलेल्या कर्मचाऱ्यांच्या कुटूंबियांना विमा कवच / सानुग्रह सहाय्य मंजूर करण्याबाबत.**
**कै. (श्री.) अमर राजाराम बनसोडे, उपशिक्षक.**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन ज्ञापन क्रमांक : सहाय्य-२०२१/प्र.क्र.६०/टीएनटी-६**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई -४०० ०३२
दिनांक : ३१ जानेवारी, २०२२

संदर्भ:-

१) वित्त विभाग, शासन निर्णय क्र. संकीर्ण २०२०/प्र.क्र. ४/व्यय-९, दिनांक २९.०५.२०२० व दिनांक. १४.१०.२०२०.
२) शालेय शिक्षण व क्रीडा विभागाचे क्रमांक: सहाय्य-२०२०/प्र.क्र.८१ /टीएनटी-६, दिनांक ०७.१२.२०२० व दिनांक १६.०३.२०२१ चे पत्र.
३) शिक्षण संचालक (माध्यमिक व उच्च माध्यमिक) यांचे पत्र क्र. कोव्हीड-१९/कवच/ सानुग्रह/बनसोडे/२३८१, दिनांक ०२/०८/२०२१.
४) मुख्य कार्यकारी अधिकारी, जि.प.सातारा यांचे क्र.शिक्षण/प्राथ/आस्था/१/३४५८/२१, दि.१५/०४/२०२१ चे नियुक्ती आदेश.

**ज्ञापन :-**

कै.(श्री.) अमर राजाराम बनसोडे, उपशिक्षक यांचा कोव्हिड-१९ संबंधित कर्तव्य बजावताना कोव्हिड-१९ मुळे दिनांक १७/०५/२०२१ रोजी मृत्यू झालेला आहे.

२. कै.(श्री.) अमर राजाराम बनसोडे, उपशिक्षक यांच्या वारसास वित्त विभागाच्या संदर्भ क्र. (१) येथील दिनांक २९.०५.२०२० च्या शासन निर्णयानुसार रु. ५०.०० लक्ष रकमेचे सानुग्रह सहाय्य देण्याबाबतचा प्रस्ताव शिक्षण संचालक (माध्यमिक व उच्च माध्यमिक) यांनी संदर्भ क्र. (३) येथील पत्रान्वये सादर केला आहे.

३. कै.(श्री.) अमर राजाराम बनसोडे, उपशिक्षक पदावर विजयनगर शिक्षण प्रसारक मंडळ संचलित प्रेमलाकाकी चव्हाण माध्यमिक विद्यालय, विजयनगर, ता.कराड, जि.सातारा येथे विनाअनुदानित पदावर दि.१०/०६/२००२ पासून कार्यरत होते.

४. कै.(श्री.) अमर राजाराम बनसोडे हे कोरोना विषाणू प्रादुर्भाव व प्रतिबंधात्मक उपाययोजनेच्या अनुषंगाने कोविड १९ बाबत अनुषंगिक माहिती भरणेसाठी तंत्रस्नेही शिक्षक म्हणून सुपने आरोग्य केंद्र, ता.कराड येथे शिक्षणाधिकारी, जि.प.सातारा यांचे दि. १५/०४/२०२१ रोजीच्या आदेशाने दि. १६/०४/२०२१ ते दि.२२/०४/२०२१ रोजी कर्तव्यावर कार्यरत होते, असे गट विकास अधिकारी वर्ग १, पंचायत समिती, कराड यांनी प्रमाणित केले आहे.

५. कै.(श्री.) बनसोडे यांचा कोव्हिड-१९ मुळे दिनांक १७/०५/२०२१ रोजी मृत्यू झाल्याचे कृष्णा हॉस्पिटल, कृष्णा इन्स्टीट्यूट व मेडिकल सायन्स विद्यापीठ, कराड यांनी दिलेल्या मृत्यू अहवालावरुन स्पष्ट होते.

६. महानगरपालिका, मलकापूर यांचेकडील कै. (श्री.)बनसोडे यांचे मृत्यू प्रमाणपत्र सादर करण्यात आले आहे. कै.(श्री.) अमर राजाराम बनसोडे यांनी नामनिर्देशित केलेल्या व्यक्तीस वारस म्हणून (पत्नी) शुभांगी अमर बनसोडे यांना रु. ५०.००लक्ष (रुपये पन्नास लक्ष फक्त) इतक्या रकमेचे सर्वकष वैयक्तिक अपघात विमा कवच / सानुग्रह सहाय्य प्रदान करण्यास वित्त विभागाच्या दिनांक २९/०५/२०२० च्या शासन निर्णयानुसार याद्वारे मंजूरी देण्यात येत आहे.

७. प्रस्तुत प्रस्तावावरील खर्च वित्त विभागाच्या अभिप्रायानुसार खाली नमूद लेखाशीर्षाखाली मंजूर अनुदानातून भागविण्यात येईल.

> "मागणी क्रमांक ई-२, (००)(०१) सर्वसाधारण माध्यमिक शाळांना सहायक अनुदान (अनिवार्य), (२२०२ ०४४२), ३१- सहायक अनुदान (वेतनेतर)."

८. सदर शासन ज्ञापन, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून, त्याचा संकेतांक २०२२०१३११३१२१४०७२१ असा आहे. हा शासन ज्ञापन डिजीटल स्वाक्षरीने सांक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Digitally signed by Sameer Anant Sawant
Date: 2022.01.31 13:13:46 +05'30'

**(समीर सावंत)**

**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत, माहिती व आवश्यक कार्यवाहीकरीता:-**

१. आयुक्त, शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे
२. शिक्षण संचालक (माध्यमिक), पुणे
३. विभागीय शिक्षण उपसंचालक, कोल्हापूर
४. जिल्हा कोषागार अधिकारी, सातारा
५. अधिक्षक, वेतन व भविष्य निर्वाह निधी पथक, (माध्यमिक), सातारा

**प्रत:- माहितीसाठी**

६. वित्त विभाग (व्यय ९)/(व्यय ५), मंत्रालय, मुंबई
७. कक्ष अधिकारी/अवर सचिव (एस एम ४)/अर्थसंकल्प, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई
८. श्रीमती शुभांगी अमर बनसोडे, रा.केसे, ता.कराड, जि.सातारा
९. निवड नस्ती (टीएनटी-६)(प्र.क्र. ६०/२०२१)